माजी सैनिकांची वर्ग ३ व वर्ग ४ मधील
त्यांचेसाठी राखीव पदावर भरती
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक:- आरटीए-१०८२-१५३६-सीआर-३६-१६अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक २० जून १९८४.

वाचा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरटीए-१०८२-१५३६-सीआर-३६-१६अ, दिनांक ९-६-१९८२.

शासन निर्णय :- माजी सैनिकांसाठी राखीव ठेवण्यात आलेल्या वर्ग ३ व वर्ग ४ मधील पदांवर नियुक्त्या करण्यासाठी उमेदवार पुरस्कृत करण्याबाबतचे आदेश शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरटीए-१०८२-१५३६-सीआर-३६-१६अ, दिनांक ९-६-८२ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. या आदेशात महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत येत नाहीत अशा वर्ग ३ मधील पदांवर माजी सैनिकांच्या नियुक्त्या करण्याबाबत कार्यपध्दती स्पष्ट केली आहे.

२. वर्ग ३ मधील जी पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत येतात त्यामधील माजी सैनिकांकरिता राखून ठेवण्यात आलेल्या १५% पदांवर भरती करण्याकरीता आयोगाशी विचार विनिमय करून आता असे आदेश देण्यात येत आहेत की संबंधीत पदावरील भरतीसाठीच्या जाहिराती जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय आणि राज्य सैनिक कल्याण विभाग, पुणे, यांचेकडे पाठविण्याची व्यवस्था महाराष्ट्र लोकसेवा आयोग करील. अशा जाहिराती जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय आणि राज्य सैनिक कल्याण विभाग, पुणे, यांचेकडे प्राप्त झाल्यानंतर सदरील कार्यालयांनी/विभागांनी त्यांचेकडील पात्र अशा माजी सैनिक उमेदवारांना लोकसेवा आयोगाकडे विहित नमुन्यात अर्ज करावयास सूचना द्याव्यात.

३. शासन निर्णय, दिनांक ९-६-८२ अन्वये नियुक्ती अधिकाऱ्यांनी माजी सैनिकांसाठी राखीव असलेली वर्ग ३ व वर्ग ४ ची १५% पदे भरताना त्या त्या जिल्हा सैनिक कल्याण कार्यालयाकडे किमान १५ दिवस अगोदर उमेदवार पुरस्कृत करण्यासाठी कळवावयाचे असते. ज्या जिल्ह्यात जिल्हा सैनिक कल्याण कार्यालये अस्तित्वात नाहीत अशा जिल्ह्यातील नियुक्ती अधिकाऱ्यांनी त्या जिल्ह्याच्या जिल्हाधिकाऱ्यांकडे मागणीपत्र पाठवावे. असे मागणीपत्र प्राप्त झाल्यानंतर त्या त्या जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या कार्यालयातील माजी सैनिकांसाठी असलेल्या कक्षामार्फत शासन निर्णय, दिनांक ९-६-८२ च्या आदेशानुसार पुढील कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र.द.माळवे,
अवर सचिव महाराष्ट्र शासन.

[कृ.मा.प.]

शामसु.रोटा/साप्रवि./एच-२८०[४५००-७-८४]

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
x प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय,
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, सेवायोजन कार्यालय, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
गृह विभाग,
शिक्षण व सेवायोजन विभाग,
ग्राम विकास विभाग,
इतर सर्व मंत्रालयीन विभाग,
संचालक, महाराष्ट्र राज्य सैनिक कल्याण विभाग, पुणे,
सचिव, सर्व जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय[द्वारा संबंधित जिल्हाधिकारी],
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-१२, १३-अ, १४-अ, २८,
x सचिव, भारतीय सैनिक नाविक, वायुसेना मंडळ, नवी दिल्ली,
x महासंचालक, पुनर्वसन, भारत सरकार, संरक्षण मंत्रालय, मौलाना आझाद रोड, नवी दिल्ली-११.
x सचिव, भारत सरकार, गृह मंत्रालय, सेवा व प्रशासकीय सुधार विभाग, नवी दिल्ली,
व्यवस्थापकीय संचालक, सर्व महामंडळे/मंडळे व राज्य शासनाच्या अधिपत्याखालील संस्थांचे प्रशासकीय अधिकारी,

x पत्राने.

---